आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या वर्षात अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना स्पर्धा परीक्षा प्रशिक्षण या योजनेसाठी निधी वितरण (लेखाशिर्ष २२२५डी३८७)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/ प्र.क्र.०२/ कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ३१ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२, दि.०८.०२.२०२३ व दि.१६.३.२०२३.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.२/कार्या-६, दि.०६.०५.२०२२.
३) आदिवासी विकास विभाग नस्ती क्र. प्रशिक्षण-२०२२/प्र.क्र. १०८/कार्या-९.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना संघ लोकसेवा आयोग/ महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांच्यामार्फत घेण्यात येणाऱ्या प्रशासकीय सेवा स्पर्धा पूर्व परीक्षांकरीता प्रशिक्षण देण्यासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदींमधून रु.३२८.३४ लाख इतका निधी अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना स्पर्धा परीक्षा प्रशिक्षण या योजनेतून वितरीत करण्याबाबत वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना स्पर्धा परीक्षा प्रशिक्षण या योजनेसाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित निधीमधून रु.३२८.३४ लाख इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :- **(रु. लाखात)**

| योजना | लेखाशीर्ष | बाब | सन २०२२-२३ साठी सुधारीत अंदाज | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा. नि. अन्वये वितरीत येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना स्पर्धा परीक्षा प्रशिक्षण | २२२५ डी ३८७ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | १४००.०० | २८०.०० | ३२८.३४ |

२. उपरोक्त प्रमाणे एकूण **रु.३२८.३४ लाख (अक्षरी रुपये तीन कोटी अठ्ठावीस लाख चौतीस हजार फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. वितरीत निधीचा विनियोग संदर्भाधीन क्र.२ येथील शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसारच करण्यात यावा. तसेच सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकांन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.३५५-२३/व्यय-१४, दि.२८.०३.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३०१४३०२५८५२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.03.31 15:30:03 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

८. कार्यासन क्र. ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.